**श्री. सुरज मांढरे आयुक्त (शिक्षण) पुणे व श्री.कैलाश पगारे राज्य प्रकल्प संचालक मुंबई यांना जागतिक शिक्षण मंच (Education World Forum) लंडनमध्ये उपस्थित राहण्यासाठी परदेश दौऱ्यास मंजूरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः विदौरा-प्र.क्र.२१/२०२३/प्रशिक्षण**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २७ एप्रिल, २०२३

वाचा :-

१) संचालक पश्चिम भारत, ब्रिटिश कौन्सिल विभाग ब्रिटिश उप उच्चायुक्त, मुंबई यांचे ११ जानेवारी,२०२३ चे पत्र व कार्यक्रमाचा तपशिल.

प्रस्तावना:-

शिक्षण राज्य सचिव, शिक्षण विभाग, युनायटेड किंग्डम (UK) यांनी लंडनमध्ये रविवार दिनांक ७ मे ते शनिवार दिनांक १३ मे, २०२३ दरम्यान होणाऱ्या जागतिक शिक्षण मंच (Education World Forum) यासाठी आमंत्रित केले आहे.

“जागतिक शिक्षण मंच” (Education World Forum) हा जगातील शिक्षण व कौशल्य मंत्र्यांचा सर्वात मोठा वार्षिक मेळावा आहे. हा कार्यक्रम दरवर्षी जानेवारी महिन्यात लंडनमध्ये आयोजित केला जातो. या कार्यक्रमाला युकेच्या फॉरेन कॉमनवेल्थ अँड डेव्हलपमेंट ऑफिस, डिपार्टमेंट फॉर एज्युकेशन डिपार्टमेंट फॉर इंटरनॅशनल डेव्हलपमेंट, डिपार्टमेंट फॉर इंटरनॅशनल ट्रेड आणि ब्रिटीश कौन्सिल यांचे समर्थन आहे.

दि. ७ मे २०२३ ते दि. १३ मे, २०२३ या दरम्यान होणारा हा १९ वा "जागतिक शिक्षण मंच (Education) World Forum) येथे राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय शिक्षण धोरणावर चर्चा केली जाणार आहे व धोरणातील नाविन्यपूर्ण कल्पनांचे समायोजन करण्यासाठी जगातील सर्व शिक्षण व कौशल्य मंत्र्यांना युनाईटेड किंगडम (UK) मध्ये आमंत्रित करण्यात आले आहे. यावर्षी होणाऱ्या जागतिक शिक्षण मंच (Education World Forum) या कार्यक्रमाची संकल्पना New Beginnings: Nurturing Learning Culture, Building Resilience, Promoting Sustainability, Stronger. Bolder, Better Education by Design ही आहे.

सध्याच्या काळातील बदलते शिक्षण आणि कोविड परिस्थितीमुळे शिक्षण क्षेत्रात झालेले बदल / येणारी आव्हाने व समस्या यांचे निराकरण करुन या बदलत्या समाजात विविध उपाययोजनांचा कशाप्रकारे उपयोग करता येईल, यावर चर्चा केली जाणार आहे. या मंचावर होणाऱ्या चर्चेच्या अनुषंगाने शिक्षणक्षेत्रात आपल्या राज्य व देशस्तरावर कोणते बदल करणे अपेक्षित आहेत, या विषयी संभाषण केले जाणार आहे. जागतिक शिक्षण मंच यामध्ये होणाऱ्या चर्चा व मार्गदर्शनानुसार आपल्या शिक्षण क्षेत्रातील आव्हाने बघून त्यानुषंगाने शैक्षणिक धोरणात बदल करता येऊ शकतात, ज्याचा राज्यातील संस्कृती व समाज यावर सकारात्मक परिणाम होईल. समाजाचा विकास कशाप्रकारे साधता येईल, राज्याचा विकास, नेतृत्व विकास, तंत्रज्ञानाचा विकास यांच्या पुढाकाराने शिक्षण क्षेत्रात बदल कसे घडवता येईल, या विषयावर मार्गदर्शन, संभाषण केले जाणार आहे.

त्याअनुषंगाने सदर "जागतिक शिक्षण मंच" (Education World Forum) या कार्यक्रमात उपस्थित राहण्यासंबंधी पाठवण्यात येणाऱ्या अधिकाऱ्यांच्या निवडीविषयी मा. मंत्री महोदय (शालेय शिक्षण) यांचेशी झालेल्या चर्चेनुसार व मान्यतेनुसार मा. मंत्री (शालेय शिक्षण), यांनी श्री. सुरज मांढरे, आयुक्त (शिक्षण), पुणे, श्री. कैलास पगारे, राज्य प्रकल्प संचालक, मुंबई यांची निवड केली आहे.

वरील अधिकाऱ्यांचा "जागतिक शिक्षण मंच (Education World Forum) येथील सहभाग आवश्यक आहे. महाराष्ट्र राज्यातील शिक्षण क्षेत्रात निर्माण झालेल्या समस्या, शिक्षण विषयक आव्हाने याविषयी संपूर्ण माहिती व सखोल ज्ञान शालेय शिक्षण विभागातील वरिष्ठ अधिकाऱ्यांना असल्यामुळे सदर कार्यक्रमात उपरोक्त अधिकाऱ्याची उपस्थिती आवश्यक व महत्त्वाची आहे. याठिकाणी होणाऱ्या चर्चेतून मिळणाऱ्या समस्यांचे निराकरण व आव्हानांचे उपाय यामुळे राज्याची शैक्षणिक गुणवत्ता वृद्धी व विकास साधला जाणार आहे.

**दौऱ्याचा उद्देश :-** देशामध्ये नविन शैक्षणिक धोरणाच्या अंमलबजावणीस सुरूवात झालेली आहे. त्यानुसार जागतिक शिक्षण मंच या ठिकाणी होणाऱ्या चर्चेमध्ये सदर अधिकाऱ्यांचा सक्रीय सहभाग लागेल व त्यानुषंगाने धोरणाची अंमलबजावणी करताना बदलत्या काळानुसार नविन तंत्रज्ञान, संस्कृती व समस्या यांचा अभ्यास करून बदल सुचवून कशाप्रकारे शिक्षण क्षेत्रात बदल अपेक्षित आहेत, याचा अभ्यास करु शकतात. शाळेतील विद्यार्थ्यांच्या गळतीचे वाढते प्रमाण, तंत्रज्ञानाचा अभाव, विविध योजनांच्या अंमलबजावणीमध्ये होणारी तफावत त्यामुळे होणारा शिक्षण या विषयांवर जागतिक शिक्षणतज्ञांशी चर्चा करून त्याविषयी उपाययोजना समजून घेण्यास मदत होणार आहे. जागतिक स्तरावरील शिक्षण मंत्री व शिक्षण तज्ञ "जागतिक शिक्षण मंच" या कार्यक्रमास उपस्थित राहणार असल्यामुळे इतर देशातील शिक्षण प्रणाली व शैक्षणिक धोरण याविषयी माहिती मिळून, त्यातील आपल्या धोरणाशी साधर्म्य असलेले मुद्दे बाबी यांचा तपशिलवार अभ्यास वरीष्ठ अधिकाऱ्यांमार्फतच केला जाऊ शकतो व यातून मिळणारे मार्गदर्शन चर्चेतून निर्माण होणाऱ्या उपाययोजना याची अंमलबजावणी योग्यरित्या राज्यस्तरावर करण्यात येऊ शकते. त्याकरीता परदेश दौऱ्यास शासन मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

लंडनमध्ये होणाऱ्या (Education World Forum) जागतिक शिक्षण मंच कार्यक्रमास उपस्थित राहण्यासाठी श्री. सुरज मांढरे आयुक्त (शिक्षण) पुणे व श्री.कैलाश पगारे राज्य प्रकल्प संचालक मुंबई यांना परदेश दौऱ्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर परदेश दौऱ्याचा कालावधी दिनांक ७ ते १३ मे २०२३, च्या दरम्यान असेल.

२. "जागतिक शिक्षण मंच" (Education World Forum) साठी जाणारे अधिकारी श्री. सुरज मांढरे, आयुक्त (शिक्षण), पुणे, श्री. कैलास पगारे, राज्य प्रकल्प संचालक, मुंबई यांच्या दौऱ्याचा संपूर्ण खर्च शालेय शिक्षण विभागांतर्गत असलेल्या महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नीरोड, मुंबई या कार्यालयामार्फत करण्यात येणार आहे.

३. सदर प्रशिक्षण कार्यक्रमाबाबत परदेश दौरा पूर्ण झाल्यानंतर संबंधित अधिकाऱ्यांनी त्यांच्या विदेश दौऱ्यासंबंधीचा विस्तृत अहवाल संबंधित प्रशासकीय विभागास आणि सामान्य प्रशासन विभागास सादर करावा. तसेच विदेश दौऱ्यात प्राप्त केलेल्या ज्ञानाचा/कौशल्याचा उपयोग अन्य अधिकारी/ कर्मचारी यांना प्रशिक्षण देण्यासाठी करावा.

४. सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाने अनौ.सं.क्र.३१/२०२३/११,दि १७.०४.२०२३ अन्वये दिलेल्या समितीचा मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे. केंद्र शासनाच्या विदेश मंत्रालयाकडून ना हरकत प्रमाणपत्र (Political Clearance) प्राप्त करुन घेण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४२८१३२६०५१७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

IMTIYAZ MUSHTAQUE KAZI

Digitally signed by IMTIYAZ MUSHTAQUE KAZI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT,
2.5.4.20=39a40419de755c2eab61fb555b2fdf8c8d6d652ff18fdffbd9c748ab01f6da04, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=77A529748C5E7C1BA7A66E81C654BA3C492FDA5B29E076241DB1BA213DDEDF4E, cn=IMTIYAZ MUSHTAQUE KAZI
Date: 2023.04.28 13:32:30 +05'30'

**( इ. मु. काझी )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सचिव,शालेय शिक्षण व क्रिडा मंत्रालय, भारत सरकार नवी दिल्ली.
२. सचिव, अर्थ मंत्रालय,आर्थिक कार्य विभाग, भारत सरकार नवी दिल्ली.सचिव, परराष्ट्र मंत्रालय,भारत सरकार, नवी दिल्ली.
३. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२.
४. अतिरिक्त मुख्य सचिव(मुख्यमंत्री सचिवालय) मंत्रालय,मुंबई-३२.
५. अतिरिक्त मुख्य सचिव (सा.प्र.वि) /कार्यासन-११, सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
७. अतिरिक्त मुख्य सचिव (वित्त) / कार्यासन सेवा -५ वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८. प्रधान सचिव शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
९. संयुक्त नियंत्रक एक्सचेंज कंट्रोल डिपार्टमेंट रिझर्व बैंक ऑफ इंडिया, मुंबई.
१०. सह सचिव (प्रशा) शालेय शिक्षण व क्रिडा विभाग , मंत्रालय, मुंबई-३२
११. उपसचिव (सा.प्र.वि./कार्यासन -१०) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

**प्रत,**

१. मा. मंत्री (शा.शि),यांचे खाजगी सचिव मंत्रालय,मुंबई.
२. श्री. सुरज मांढरे, आयुक्त (शिक्षण), पुणे,
३. श्री. कैलास पगारे, राज्य प्रकल्प संचालक, मुंबई.